**विधि व न्याय विभागाच्या अधिनस्त निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांच्या नावात बदल करणेबाबत आणि सदर कार्यालयांकरिता कार्यालय प्रमुख तसेच आहरण व संवितरण अधिकारी घोषित करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:-आयपीए-२१२५/प्र.क्र.३७/कार्या-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

**दिनांक:- ०९ मे, २०२५.**

**संदर्भ :** १) विधि व न्याय विभाग शासन निर्णय क्र. आयपीए २११६/प्र.क्र.३७/का.एक, दि.१३.१२.२०१९

२) विधि व न्याय विभाग शासन निर्णय क्र. आयपीए २१२२/प्र.क्र.८१/दोन, दि.१९.०९.२०२४

**प्रस्तावना :**

भारतीय भागीदारी अधिनियम, १९३२ व मुंबई व्यापारेत्तर निगम अधिनियम, १९५९ ची अंमलबजावणी करण्याकरिता महाराष्ट्र राज्यात विधि व न्याय विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य, मुंबई हे कार्यालय निर्माण करण्यात आलेले आहे. सदर कार्यालयाचे मुख्यालय मुंबई येथे असून, पुणे, छत्रपती संभाजीनगर व नागपूर येथे प्रादेशिक कार्यालये आहेत. पुणे, छत्रपती संभाजीनगर व नागपूर येथील प्रादेशिक कार्यालयांचे कार्यालयप्रमुख सहायक निबंधक असल्याने, सदर कार्यालयांना "सहायक निबंधक भागीदारी संस्था यांचे कार्यालय" असे संबोधण्यात येते.

संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या नियंत्रणाखालील पुणे, छत्रपती संभाजीनगर व नागपूर येथील प्रादेशिक कार्यालयांत सहायक निबंधक, गट-ब (राजपत्रित) यांना वरिष्ठ असलेले उपनिबंधक, गट-अ हे पद निर्माण करण्यात आलेले आहे. त्यानुसार, प्रशासकीय सुलभतेकरिता सदर कार्यालयांच्या नावात बदल करण्याची तसेच सदर कार्यालयांकरिता नव्याने कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

विधि व न्याय विभागाच्या अधिनस्त निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयांच्या नावात खालीलप्रमाणे बदल करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | कार्यालयाचे ठिकाण | कार्यालयाचे यापूर्वीचे नाव | कार्यालयाचे नवीन नाव |
|---|---|---|---|
| १ | मुंबई | निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य, मुंबई | नावात बदल नाही. |

| | | | |
|---|---|---|---|
| २ | पुणे | सहायक निबंधक भागीदारी संस्था, पुणे | उप निबंधक भागीदारी संस्था, पुणे |
| ३ | छत्रपती संभाजीनगर | सहायक निबंधक भागीदारी संस्था, छत्रपती संभाजीनगर | उप निबंधक भागीदारी संस्था, छत्रपती संभाजीनगर |
| ४ | नागपूर | सहायक निबंधक भागीदारी संस्था, नागपूर | उप निबंधक भागीदारी संस्था, नागपूर |

२. तसेच, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-एक मधील अ.क्र.१ ते ३, नियम क्र.२ अन्वये प्राप्त अधिकारांचा वापर करुन, निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य यांचे अधिनस्त अधिका-यांना विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख म्हणून घोषित करण्याबाबतचे यापूर्वीचे सर्व शासन निर्णय/कार्यालयीन आदेश अधिक्रमित करुन, निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य यांचे अधिनस्त कार्यालयांसाठी खालीलप्रमाणे विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर आदेश वित्तीय बाबींपुरतेच मर्यादित राहतील.

| **अ.क्र.** | **कार्यालयाचे ठिकाण** | **कार्यालय प्रमुख** | **विभाग प्रमुख** |
|---|---|---|---|
| १ | मुंबई | उप निबंधक भागीदारी संस्था, मुंबई | निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य, मुंबई |
| २ | पुणे | उप निबंधक भागीदारी संस्था ,पुणे | |
| ३ | छत्रपती संभाजीनगर | उप निबंधक भागीदारी संस्था ,छत्रपती संभाजीनगर | |
| ४ | नागपूर | उप निबंधक भागीदारी संस्था ,नागपूर | |

३. तसेच, निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य यांचे अंतर्गत कार्यालयांकरिता बीम्स प्रणालीवरील अनुदान वाटप/खर्च, इ. बाबींसाठी निबंधक भागीदारी संस्थेतील अधिका-यांना आहरण व संवितरण अधिकारी/नियंत्रक अधिकारी घोषित करण्याबाबतचे यापूर्वीचे सर्व शासन निर्णय/आदेश अधिक्रमित करुन, खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर आदेश वित्तीय बाबींपुरतेच मर्यादित राहतील.

| **अ.क्र.** | **कार्यालयाचे ठिकाण** | **आहरण व संवितरण अधिकारी** | **नियंत्रक अधिकारी** |
|---|---|---|---|
| १ | मुंबई | उप निबंधक भागीदारी संस्था, मुंबई | निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य, मुंबई (J००६४) |
| २ | पुणे | उप निबंधक भागीदारी संस्था ,पुणे | |
| ३ | छत्रपती संभाजीनगर | उप निबंधक भागीदारी संस्था ,छत्रपती संभाजीनगर | |
| ४ | नागपूर | उप निबंधक भागीदारी संस्था ,नागपूर | |

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०५०९१४४९५८०४३७१२ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANISHA ANIL KADAM

Digitally signed by MANISHA ANIL KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=6e49954abe1615213c9867d36416b4646311d3a20fa0e8638f40554d1f74d87b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=46C6AAD763D6F6FE01CAEF299F7BF533D85983B1491695AAAE025643F38D12D4, cn=MANISHA ANIL KADAM
Date: 2025.05.09 14:50:58 +05'30'

**(मनिषा कदम)**
**सहायक सॉलिसिटर-नि-उप सचिव,**
**महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा. मुख्यमंत्री महोदयांचे सचिव.
२. मा. राज्यमंत्री (विधि व न्याय) यांचे खाजगी सचिव.
३. महालेखापाल, लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
४. निबंधक भागीदारी संस्था, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. सर्व उपनिबंधक/सहायक निबंधक
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/छत्रपती संभाजीनगर/नागपूर.
९. वित्त विभाग (व्यय-५/अर्थ-११/विनियम), मंत्रालय, मुंबई.
१०. विधि व न्याय विभाग (कार्यासन १७/२३/२४/२५), मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती(का-१).